गृह विभागाच्या अधिपत्याखालील पोलीस महासंचालक व इतर कार्यालयासाठी स्वीय सहायक, गट-ब (राजपत्रित) संवर्गातील पदे वरिष्ठ स्वीय सहायक, गट-अ (राजपत्रित) संवर्गात श्रेणीवाढ करण्याबाबत......

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः रापोसे २२१४/प्र.क्र.२१२/पोल १ (अ)**

३० वा मजला, सेंटर १, जागतिक व्यापार केंद्र, कुलाबा, मुंबई ४०० ००५.

तारीख: १ ऑक्टोंबर, २०१४

**संदर्भ :-** १)शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एसआरव्ही-२०१०/प्र.क्र. २७१/१२, दिनांक २९ जानेवारी २०१४

२)गृह विभाग क्र. एमआयएस ०१०८/५८८/पोल १, दिनांक १४ मार्च २००८

३)पोलीस महासंचालक यांचे पत्र क्र.पोमंस ८-अ/स्वीस-श्रेणीवाढ/१३३/२००८, दिनांक ३० ऑगस्ट २००८

४)पोलीस महासंचालक यांचे पत्र क्र. पोमंस ८-अ/व.स्वी.स./श्रेणीवाढ/६७/२०१४ दि.९.९.२०१४

**प्रस्तावना**

गृह विभागाच्या अधिपत्याखालील पोलीस महासंचालक व इतर कार्यालयातील स्वीय सहायक, गट ब (राजपत्रित) (वेतनश्रेणी रु.९३०० - ३४८०० + ग्रेड पे रु.४६००) संवर्गातील तत्कालीन मंजूर ३८ पदांपैकी १० पदांना वरिष्ठ स्वीय सहायक पदामध्ये गट अ (राजपत्रित)(वेतनश्रेणी रु.१५६०० -३९१००, ग्रेड पे ६६०० मध्ये) श्रेणीवाढ करण्यास संदर्भाधीन क्र.१ येथील दिनांक २९.१.२०१४ च्या शासन निर्णयान्वये (उच्च सचिव समितीच्या दिनांक १४.०६.२०१३ च्या निर्णयानुसार) मान्यता देण्यात आलेली आहे. त्यानुसार गृह विभागाच्या अधिपत्याखालील पोलीस महासंचालक व इतर कार्यालयातील स्वीय सहायक संवर्गातील १० पदे “वरिष्ठ स्वीय सहायक” संवर्गात श्रेणीवाढ करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय

उपरोक्त प्रस्तावास अनुसरुन गृह विभागाच्या अधिपत्याखालील पोलीस महासंचालक व इतर कार्यालयातील स्वीय सहायक, गट-ब (राजपत्रित) (वेतनश्रेणी रु.९३०० - ३४८०० + ग्रेड पे रु.४६००) या संवर्गातील तत्कालीन मंजूर ३८ पदांपैकी खालील १० पदांची “वरिष्ठ स्वीय सहायक”गट-अ (वेतनश्रेणी रु.१५६०० -३९१००, ग्रेड पे ६६०० मध्ये) या संवर्गात श्रेणीवाढ करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिका-याचे नाव | श्रेणीवाढी नंतरचे पद |
|---|---|---|
| १. | महासंचालक व पोलीस महानिरिक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई | वरिष्ठ स्वीय सहायक |
| २. | महासंचालक, लाचलूचपत प्रतिबंधक विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई | वरिष्ठ स्वीय सहायक |
| ३. | व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ मर्यादित, मुंबई | वरिष्ठ स्वीय सहायक |
| ४. | महासमादेशक, गृहरक्षक दल व संचालक, नागरी संरक्षण, महाराष्ट्र राज्य मुंबई | वरिष्ठ स्वीय सहायक |
| ५. | आयुक्त, राज्य गुप्तवार्ता विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई | वरिष्ठ स्वीय सहायक |
| ६. | अपर पोलीस महासंचालक, गुन्हे अन्वेषण विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे | वरिष्ठ स्वीय सहायक |
| ७. | पोलीस आयुक्त,बृहन्मुंबई | वरिष्ठ स्वीय सहायक |
| ८. | पोलीस आयुक्त, ठाणे | वरिष्ठ स्वीय सहायक |
| ९. | पोलीस आयुक्त, पुणे | वरिष्ठ स्वीय सहायक |
| १०. | पोलीस आयुक्त, नागपूर | वरिष्ठ स्वीय सहायक |

उपरोक्तप्रमाणे स्वीय सहायक या संवर्गातील सध्याच्या मंजूर ४९ पदांपैकी १० पदे “वरिष्ठ स्वीय सहायक” या संवर्गात श्रेणीवाढ केल्यानंतर, स्वीय सहायक या संवर्गाचे मंजूर संख्याबळ ३९ इतके राहील.

२. सदर पदांचे सेवाप्रवेश नियम, सामान्य प्रशासन विभागाकडून स्वतंत्रपणे विहित करण्यात येतील. त्यामुळे प्रस्तुत पदांचे सेवाप्रवेश नियम विहित करेपर्यंतच्या कालावधीत सदर पदे केवळ पदोन्नतीने भरण्यास मान्यता राहील. पदोन्नतीसाठी शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग दि.२३/१२/२००२ व दि.२५/२/२००५ मधील निकष, तसेच पदोन्नतीसंदर्भात वेळोवेळी विहित करण्यात

येणारे निकष पूर्ण होणे आवश्यक राहील. तसेच या पदोन्नतीकरीता शासनाच्या धोरणानुसार आरक्षण लागू राहील. मात्र हे पद “गट अ” दर्जाचे असल्याने यावर पदोन्नतीसाठी निवडसूची प्रशासकीय विभागाने सामान्य प्रशासन विभागास सहमतीसाठी सादर करणे आवश्यक राहील. त्यासंदर्भात शासन निर्णय, सा.प्र.वि., दि.२४/०२/२०११ मधील आदेशानुसार कार्यवाही करण्यात यावी.

३. सदरहू १० पदांची श्रेणीवाढ केल्याने होणारा वाढीव खर्च संबंधित आस्थापनेच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१००९१२२६०८५०२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pradip Motiram Balkavde

Digitally signed by Pradip Motiram Balkavde
DN: CN = Pradip Motiram Balkavde, C = IN, S = MAHARASHTRA, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = HOME
Date: 2014.10.09 15:35:07 +05'30'

**( प्र. मो. बलकवडे )**
कार्यासन अधिकारी, गृह विभाग,महाराष्ट्र शासन

प्रति,
महासंचालक व पोलीस महानिरिक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
प्रतिलिपि
महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
मा.मंत्री(गृह) यांचे खाजगी सचिव
मा. राज्यमंत्री (गृह) यांचे ,खाजगी सचिव
महासंचालक, लाचलूचपत प्रतिबंधक विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई
अपर पोलीस महासंचालक (आस्थापना), महाराष्ट्र राज्य, मुंबई
अपर पोलीस महासंचालक, गुन्हे अन्वेषण विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे
व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ मर्यादित, मुंबई
महासमादेशक, गृहरक्षक दल व संचालक, नागरी संरक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई

विशेष पोलीस महानिरीक्षक (प्रशासन), महाराष्ट्र राज्य, मुंबई
आयुक्त, राज्य गुप्तवार्ता विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
पोलीस आयुक्त,बृहन्मुंबई/पुणे/ठाणे/नागपूर
जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/ठाणे/नागपूर.
सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन-१२, मंत्रालय, मुंबई
निवडनस्ती-पोल१-अ